म्हणून तो त्याच्या जवळ प्राप्त झाला. राजानें त्याला सन्मानपूर्वक बसवून घेतलें, तेव्हां व्रतस्थ बसलेल्या राजाला नम्रतापूर्वक त्या साधूनें[1] प्रश्न केला ॥ ५ ॥ साधु म्हणाला, महाराज, मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें आपण हें काय करीत आहां? सांप्रत मला ऐकण्याची फार इच्छा आहे, तर आपण तें सर्व उघड करून सांगा. ॥ ६ ॥ याप्रमाणें त्या साधूनें आस्थापूर्वक प्रश्न केला, तो ऐकून राजा

साधुरुवाच ॥ किमिदंकुरुषेराजन्भक्तियुक्तेनचेतसा ॥ प्रकाशंकुरुतत्सर्वंश्रोतुमिच्छामिसांप्रतं ॥ ६ ॥ राजोवाच ॥ पूजनंक्रियतेसाधोविष्णोरतुलतेजसः ॥ व्रतंचस्वजनैःसार्द्धंपुत्राद्यावाप्तिकाम्यया ॥ ७ ॥ भूपस्यवचनंश्रुत्वासाधुःप्रोवाचसादरं ॥ सर्वंकथयमेराजन्करिष्येहंतवोदितं ॥ ८ ॥

उल्कामुख म्हणाला, शेटजी, ज्याच्या तेजाला उपमा नाहीं, अशा भगवान् सत्यनारायणरूपी विष्णूची मी पुत्रादिकांची प्राप्ति व्हावी ह्या इच्छेनें आप्त इष्ट मित्रांसहवर्तमान पूजा करीत आहें. ॥ ७ ॥ हें ऐकून तो साधु आदरपूर्वक पुनः राजाला म्हणाला, महाराज, मला विस्तारपूर्वक सर्व सांगा. आपण सांगाल

---

१ साधु हें विशेष नाम नव्हे. व्यापारीलोक पत राहून व्यापार चांगला चालण्याकरितां निदान बाह्यात्कारीं तरी सत्याचा ढोल दाखवितात; म्हणूनच लोक त्याला साव अर्थात् साधु म्हणतात साव हा साधुशब्दाचा अपभ्रंश असावा.

त्याप्रमाणें हें व्रत करावें अशी माझीही इच्छा आहे. ॥ ८ ॥ मलाही संतति नाहीं. ह्या व्रतापासून जर खचीत संतति प्राप्त होत असेल, तर मीही हें व्रत करीन. याप्रमाणें वाण्यानें अगत्यपूर्वक विचारल्यावरून उल्कामुख राजानें त्याला ह्या व्रताचें विधान व फल वगैरे सर्व सांगितलें. तें ऐकून आपण हें व्रत करणार असें सांगून तो वाणी राजाचा निरोप घेऊन तेथून निघाला व मोठ्या आनंदानें आप-

ममापिसंततिर्नास्तिएतस्माज्जायतेध्रुवं ॥ ततोनिवृत्त्यवाणिज्यात्सानंदोगृहमागतः॥ ॥ ९ ॥ भार्यायैकथितंसर्वंव्रतंसंततिदायकं ॥ तदाव्रतंकरिष्यामियदामेसंततिर्भवेत् ॥ १० ॥ इतिलीलावतींप्राहपत्नींसाधुःससत्तमः ॥ एकस्मिन्दिवसेतस्यभार्यालीलावतीसती ॥ ११ ॥

ल्या घरीं प्राप्त झाला. ॥ ९ ॥ आणि आपली स्त्री जी लीलावती तीस ह्मणाला कीं, मला संतति देणारें असें सत्यनारायणाचें व्रत उल्कामुखराजानें सांगितलें आहे. तें ऐकून लीलावती ह्मणाली, जर तें व्रत केलें असतां संतति प्राप्त होते असें आहे तर आपणहि तें करावें. तेव्हां तो ह्मणाला, तूर्त संकल्प केला ह्मणजे झालें, जेव्हां मला संतति होईल तेव्हां मी हें व्रत खचित करीन ॥ १० ॥ असें तो साधुवाणी लीलावतीस

सांगता झाला. पुढें एके दिवसीं त्याची स्त्री महासाध्वी लीलावती ॥ ११ ॥ आनंदयुक्त होत्साती भर्त्यासह एकांतांत होती, त्यावेळीं तिचें अंतःकरण धर्मावर आसक्त झालें होतें; अशा उत्तम वेळीं सत्यनारायणाच्या प्रसादानें तीस गर्भ धारण झालें ॥ १२ ॥ क्रमानें नऊ महिने पूर्ण होऊन दाहाव्या महिन्यांत

भर्तृयुक्तानंदचित्ताभवद्धर्मपरायणा ॥ गर्भिणीसाभवत्तस्यभार्यासत्य
प्रसादतः ॥ १२ ॥ दशमेमासिवैतस्याःकन्यारत्नमजायत ॥ दिने
दिनेसाववृधेशुक्लपक्षेयथाशशी ॥ १३ ॥ नाम्नाकलावतीचेतितन्ना
मकरणंकृतं ॥ ततोलीलावतीप्राहस्वामिनंमधुरंवचः ॥ १४ ॥

ती प्रसूत झाली, व तिला एक उत्तम लक्षणसंपन्न असें कन्यारत्न झालें. ती मुलगी प्रतिदिवसीं शुक्लपक्षांतल्या चंद्रकलेप्रमाणें वाढूं लागली ॥ १३ ॥ ह्मणून त्याणें तिचें कलावती असें नांव ठेविलें. पुढें साधूची स्त्री लीलावती आपल्या पतीला गोड शब्दांनीं ह्मणाली ॥ १४ ॥

---

१ सामान्यतः पुत्र व्हावा अशी त्या उभयतांची इच्छा असावी असें दिसतें, व त्याप्रमाणें सत्यनारायणाच्या कृपेनें मुलगा व्हावा तो नहोतां कन्या झाली हें काय? अशी येथें कोणाला शंका येईल. पण त्या वाण्यानें मुलगा अथवा मुलगी याबद्दल विशेष संकल्प केलाच नव्हता. संतति झाली ह्मणजे व्रत करावें, एवढाच त्याचा संकल्प होता.

स.ना. ||२०|| क. ||२०||

अहो, आपण सत्यनारायणाचें व्रत करण्याचा संकल्प केला होता; त्याप्रमाणें देवाच्या कृपेनें आपल्याला संततिही झाली. मग आतां तें व्रत कांबरें करीत नाहीं? हें ऐकून साधु ह्मणाला, अग प्रिये, ह्या आपल्या कलावतीचें लग्न करूं त्याच वेळीं मोठ्या समारंभानें हेंहि व्रत उरकून घेऊं ह्मणजे झालें ||१५ || या-

नकरोषिकिमर्थंवैपुरासंकल्पितंव्रतं ॥ साधुरुवाच ॥ विवाहसमयेत्वस्याःकरिष्यामिव्रतंप्रिये ॥१५॥ इतिभार्यांसमाश्वास्यजगामनगरंप्रति ॥ ततःकलावतीकन्यावव्रृधेपितृवेश्मनि ॥ १६ ॥ दृष्ट्वाकन्यांततःसाधुर्नगरेसखिभिःसह ॥ मंत्रयित्वाद्रुतंदूतंप्रेषयामासधर्मवित् ॥ १७ ॥ विवाहार्थंचकन्यायावरंश्रेष्ठंविचारय ॥ तेनाज्ञप्तश्चदूतोऽसौकांचनंनगरंययौ ॥ १८ ॥

प्रमाणें तो आपल्या बायकोची समजूत करून आपण व्यापाराकरितां ग्रामांतरीं गेला. हिकडे ती कलावती कन्या बापाच्या घरीं वाढून उपवर झाली. || १६ || तों साधुवाणी घरीं आला नंतर तो धर्मज्ञ साधु आपली कन्या उपवर झाली असें पाहून आपल्या मित्रांसह विचार करून योग्य वर पाहून आणण्याकरितां एक दूत पाठविता झाला. ||१७|| आणि त्याला ह्मणाला कीं, माझ्या मुलीकरितां उत्तम व सर्व-

गुणसंपन्न असा वर पाहून आण. याप्रमाणें त्यासाधूची आज्ञा घेऊन तो दूत कांचन नांवाच्या नगरास गेला ॥ १८ ॥ तेथें चहूंकडे शोध करून कुलशीलादिकांनीं युक्त असा एक वाण्याचा मुलगा पाहून त्यास बरोबर घेऊन तो दूत पुनः साधूजवळ आला. रूपानें सुंदर व गुणांनीं संपन्न अशा त्या तरुण

तस्मादेकंवणिकपुत्रंसमादायाऽऽगतोहिसः ॥ दृष्ट्वातुसुंदरंबालंवणिकपुत्रंगुणान्वितं ॥ १९ ॥ ज्ञातिभिर्बंधुभिःसार्द्धंपरितुष्टेनचेतसा ॥ दत्तवान्साधुःपुत्रायकन्यांविधिविधानतः ॥ २० ॥ ततोभाग्यवशात्तेनविस्मृतंव्रतमुत्तमं ॥ विवाहसमयेतस्यास्तेनरुष्टोऽभवत्प्रभुः ॥ २१ ॥ ततःकालेननियतोनिजकर्मविशारदः ॥ वाणिज्यार्थंगतःशीघ्रंजामातृसहितोवणिक् ॥ २२ ॥

मुलग्याला पाहून साधु संतुष्ट झाला ॥ १९ ॥ नंतर त्यानें विवाहतिथीचा निश्चय करून आपल्या आप्त, इष्ट मित्रांसह मोठ्या आनंदानें आपली कन्या कलावती त्या वराला यथाविधि विवाह करून दिली.॥ ॥२०॥ लग्नाच्या समारंभांत त्यानें व्रत करावयाचें, पण त्याची त्याला दुर्दैवानें आठवण राहिली नाहीं; त्यामुळें भगवान् सत्यनारायण त्याच्यावर मनांत रुष्ट झाले. ॥ २१ ॥ पुढें त्या साधूनें आपणास पुत्र

नाहीं, तेव्हां आपल्या ऐश्वर्याचा वारस जांवईच आहे, याकरितां त्यास आपल्या व्यापारधंद्याची माहिती करून द्यावी ह्मणून घरजांवई करून ठेविला. पुढें तो साधु लवकरच त्या आपल्या जांवयास बरोबर घेऊन व्यापाराकरितां देशांतरास गेला ॥ २२ ॥ सिंधुनदीच्या जवळ चंद्रकेतुराजाचें रम्य असें

रत्नसारपुरेरम्येगत्वासिंधुसमीपतः ॥ वाणिज्यमकरोत्साधुर्जामात्राश्रीमतासह ॥ ॥ २३ ॥ तौगतौनगरेरम्येचंद्रकेतोर्नृपस्यच ॥ एतस्मिन्नेवकालेतुसत्यनारायणःप्रभुः ॥ २४ ॥ भ्रष्टप्रतिज्ञमालोक्यशापंतस्मैप्रदत्तवान् ॥ दारुणंकठिनंचास्यमहदुःखंभविष्यति ॥ २५ ॥ एकस्मिन्दिवसेराज्ञोधनमादायतस्करः ॥ तत्रैवचागतश्चौरोवणिजौयत्रसंस्थितौ ॥ २६ ॥

रत्नसार नांवाचें नगर होतें, त्यांत जाऊन तो साधु जांवयासह तेथें व्यापार करूं लागला, इतक्यांत तो सत्यनारायणप्रभु ॥ २३ ॥ २४ ॥ साधूनें आपल्या प्रतिज्ञेचा भंग केला ह्मणून त्याला मोठें भयंकर व कठीण दुःख प्राप्त होईल असा शाप देताझाला. ॥ २५ ॥ असा ईश्वर कोपल्यावर मग नाश होण्यास किती उशीर ! एके दिवशीं एक चोर राजवाड्यांत चोरी करून द्रव्य घेऊन पळत पळत

ज्याठिकाणीं जांवयासह साधु होता तेथें प्राप्त झाला ॥ २६ ॥ इतक्यांत आपल्या मागुन राजदूत धांवत येत आहेत असें त्या चोरानें पाहून भीतीनें तें चोरलेलें सर्व द्रव्य ते दोघे वाणी होते तेथें हळूच ठेवून, तो तत्काल कोठें दिसेनासा झाला ॥ २७ ॥ लगेच मागाहून राजाचे शिपाई धांवत आले. जेथें तो

तत्पश्चाद्धावकान्दूतान्दृष्ट्वाभीतेनचेतसा ॥ धनंसंस्थाप्यतत्रैवसतुशीघ्रमलक्षितः ॥ २७ ॥ ततोदूताःसमायातायत्रास्तेसज्जनोवणिक् ॥ दृष्ट्वानृपधनंतत्रबध्वानीतौ वणिक्सुतौ ॥ २८ ॥ हर्षेणधावमानाश्चऊचुर्नृपसमीपतः ॥ तस्करौद्वौसमानीतौ विलोक्याज्ञापयप्रभो ॥ २९ ॥

वाणी बसला होता, तेथें त्याच्या जवळ चोरीचा माल पडलेला पाहून, त्यांनीं त्याविषयीं विशेष विचार न करितां एकदम त्या दोघांच्या मुसक्या बांधल्या ॥ २८ ॥ आपण चोराला धरिलें, ह्मणून मोठ्या आनंदानें दवडत त्यां दोघांना राजवाड्यांत नेऊन राजास सांगितलें. महाराज, दोघे चोर पकडून आणिले आहेत ते पहावे, आणि त्यांना काय शिक्षा करावयाची ती आज्ञा करावी ॥ २९ ॥

तें ऐकून राजानें चोरांची विशेष चौकशी न करितां चोरीचा मालमुद्दा त्यांच्या जवळ सांपडला ह्मणून त्यानें त्या दोघांच्या पायांत बिड्या घालून त्यांना बंदिशाळेंत ठेवण्याविषयीं हुकूम केला, व त्याप्रमाणें त्यादोघांना तुरुंगांत ठेविलें ॥ ३० ॥ साधु आणि त्याचा जांवई दोघेही, आह्मी चोरी केली नाहीं, आमचेकडे कांहीं अपराध नाहीं, ह्मणून ओरडून वरचेवर सांगत होते. तरी सत्यनारायणाच्या मायेनें

राज्ञाज्ञप्तास्ततःशीघ्रंदृढंबध्वातुतावुभौ ॥ स्थापितौद्वौमहादुर्गेकारागारेऽविचारतः ॥ ३० ॥ माययासत्यदेवस्यनश्रुतंकैस्तयोर्वचः ॥ अतस्तयोर्धनंराज्ञागृहीतंचंद्रकेतुना ॥ ३१ ॥ तच्छापाच्चतयोर्गेहेभार्याचैवातिदुःखिता ॥ चोरेणापहृतंसर्वंगृहेयच्चस्थितंधनं ॥ ३२ ॥

मोहित झाल्यामुळें कोणीही त्यांच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. व त्या चंद्रकेतूराजानें त्यांच्या दुकानांत जें काय होतें तेंहि सारें लुटून नेलें. ॥ ३१ ॥ याप्रमाणें इकडे त्या दोघांची दशा झाली, व त्यांच्या घराकडेही सत्यनारायणाच्या शापानें त्याची स्त्री लीलावती फार दुःखित झाली. बाहेर लोकांकडे येणें होतें तें त्यांनीं दिलें नाहीं. घरांत होतें नव्हतें तें सर्व चोरांनीं नेलें. ॥ ३२ ॥

तीस सर्वप्रकारची काळजी उत्पन्न झाली. शरीराला समाधान नाहींसें झालें. पोटाला अन्न मिळेना. कधीं कधीं प्यायला पाणी देखील मिळेना. पोटाला कांहींतरीं भाकरी तुकडा मिळेल ह्मणून केव्हां केव्हां घरोघर फिरूं लागली. तिची मुलगी कलावती तर प्रतिदिवशीं अन्न मागायला फिरत असे ॥ ३३ ॥

आधिव्याधिसमायुक्ताक्षुत्पिपासातिदुःखिता॥ अन्नचिंतापराभूत्वाबभ्रामचगृहेगृहे ॥ कलावतीतुकन्यापिबभ्रामप्रतिवासरं ॥ ३३ ॥ एकस्मिन्दिवसेजाताक्षुधार्ताद्विजमंदिरं ॥ गत्वापश्यद्व्रतंतत्रसत्यनारायणस्यच ॥ ३४ ॥ उपविश्यकथांश्रुत्वावरंप्रार्थितवत्यपि ॥ प्रसादभक्षणंकृत्वाययौरात्रौगृहंप्रति ॥ ३५ ॥ माताकलावतींकन्यांकथयामासप्रेमतः ॥ पुत्रिरात्रौस्थिताकुत्रकिंतेमनसिवर्तते ॥ ३६ ॥

याप्रमाणें बरेच दिवस गेले. एके दिवशीं कलावती फार क्षुधित होत्साती एका ब्राह्मणाच्या घरीं अन्न मागावयास गेली, तों तेथें सत्यनारायणाचें व्रत चाललें आहे असें तिनें पाहिलें ॥ ३४ ॥ तेव्हां ती तेथें बसली आणि स्वस्थअंतःकरणानें कथा ऐकून तिनें देवाची प्रार्थना करून नवस केला. आणि नंतर मिळालेला प्रसाद भक्षण करून मोठ्या रात्रीं आपल्या घरीं गेली ॥ ३५ ॥ कलावती घरीं येतांच ली-

लावती प्रेमानें तिला ह्मणाली, मुली, तूं तरुण आहेस. रात्रींच्या वेळीं परक्या ठिकाणीं राहणें योग्य नाहीं, असें असून तूं एवढी रात्र कोठें राहिली होतीस? तुझ्या मनांत आहे तरी काय? ॥ ३६ ॥ कलावती ह्मणाली, आईग, मी दुसरीकडे कोठें गेलें, नव्हत्यें. एका ब्राह्मणाच्या घरीं गेलें तों तेथें सत्यनारायणनांवाचें व्रत चाललें होतें, तें संपूर्ण होईपर्यंत तेथें बसलें आणि प्रसाद भक्षण करून ही आतां

कन्याकलावतीप्राहमातरंप्रतिसत्वरं ॥ द्विजालयेव्रतंमातर्दृष्टंवांछितसिद्धिदं ॥ ३७ ॥ तच्छ्रुत्वाकन्यकावाक्यंव्रतंकर्तुंसमुद्यता ॥ सामुदातुवणिग्भार्यासत्यनारायणस्यच ॥ ३८ ॥ व्रतंचक्रेसैवसाध्वीबंधुभिःस्वजनैःसह ॥ भर्तृजामातरौक्षिप्रमागच्छेतां स्वमाश्रमं ॥ ३९ ॥

तेथूनच आलें. तें व्रत इच्छित कामना पूर्ण करणारें आहे असें मी ऐकिलें ॥ ३७ ॥ असें मुलीचें भाषण ऐकून लीलावतीला पूर्वीं नवसलेल्या व्रताची आठवण झाली, तेव्हां तिच्या घरांत कांहीं द्रव्य राहिलें नव्हतें, तरी जें काय मिळालें तें घेऊन ती लीलावती मोठ्या आनंदानें व्रत करायला तयार झाली ॥३८॥ त्या पतिव्रता स्त्रीनें आपल्या आप्त, इष्टमित्रांला बोलावून तें व्रत यथास्थित केलें आणि आपला भर्ता व जांवई

सुखरूपपणीं लवकर घरीं येऊंदेत. ॥ ३९ ॥ माझा नवरा व जांवई यांच्या हातून जे अपराध झाले असतील त्यांची क्षमा करून, देवा सत्यनारायणा, त्यांना लवकर घरीं आण, अशी तिनें वारंवार मनःपूर्वक प्रार्थना केली. तेव्हां त्या व्रताच्या योगानें भगवान् सत्यनारायण पुनः प्रसन्न झाला ॥ ४० ॥

अपराधंचमेभर्तुर्जामातुःक्षंतुमर्हसि ॥ व्रतेनानेनतुष्टोऽसौसत्यनारायणःपुनः ॥
॥ ४० ॥ दर्शयामासस्वप्नंहिचंद्रकेतुंनृपोत्तमं ॥ बंदिनौमोचयप्रातर्वणिजौनृपसत्तम
॥ ४१ ॥ देयंधनंचतत्सर्वंगृहीतंयत्त्वयाऽधुना ॥ नोचेत्त्वांनाशयिष्यामिसराज्य
धनपुत्रकं ॥ ४२ ॥ एवमाभाष्यराजानंध्यानगम्योऽभवत्प्रभुः ॥ ततःप्रभातसम
येराजाचस्वजनैःसह ॥ ४३ ॥

आणि त्यानें रत्नसारपुराचा राजा जो चंद्रकेतु त्याला स्वप्नांत सांगितलें कीं, राजा तूं जे दोघे वाणी प्रतिबंधांत ठेविले आहेस, त्यांना उद्यां उजडतांच लौकर सोडून दे. ॥ ४१ ॥ आणि त्यांचें जें द्रव्य तूं घेतलें आहेस तें सर्व त्यांना परत दे. असें न करशील तर तुझें राज्य, ऐश्वर्य व पुत्र यांसहवर्तमान तुला मी नाहींसा करून टाकीन. ॥ ४२ ॥ याप्रमाणें राजाला स्वप्नांत दृष्टांत देऊन भगवान् अदृश्य झाले. नं-

तर राजा प्रातःकाळीं आपल्या मित्रांसह सभेंत जाऊन बसला ॥ ४३ ॥ व त्याणें प्रधानादिकांना तें स्वप्न सांगितलें, आणि त्या दोघां वाण्यांस लवकर सोडून देण्याविषयीं हुकूम केला. ॥ ४४ ॥ राजाचा हुकूम ऐकून प्रधानानें साधु व त्याचा जांवई या दोघांनाही त्यांच्या पायांतल्या बिड्या काढून सन्मान-

उपविश्यसभामध्येप्राहस्वप्नंजनंप्रति ॥ बद्धौमहाजनौशीघ्रंमोचयद्वौवणिक्सुतौ ॥ ४४ ॥ इतिराज्ञोवचःश्रुत्वामोचयित्वामहाजनौ ॥ समानीयनृपस्याग्रेप्राहुस्ते विनयान्विताः ॥४५ ॥ आनीतौद्वौवणिक्पुत्रौमुक्तौनिगडबंधनात् ॥ ततोमहाज नौनत्वाचंद्रकेतुंनृपोत्तमं ॥ ४६ ॥ स्मरंतौपूर्ववृत्तांतंनोचतुर्भयविह्वलौ ॥ राजाव णिक्सुतौवीक्ष्यवचःप्रोवाचसादरं ॥ ४७ ॥

पूर्वक राजाच्या पुढें आणविलें व कामदारांनीं नम्रतापूर्वक राजाला विनंति केली कीं ॥ ४५ ॥ महाराज, त्या दोघां वैश्यांच्या पायांतल्या बिड्या काढून त्यांना येथें आणिलें आहे. हें ऐकून तितक्यांत त्या दो- घांनीं नृपश्रेष्ठ चंद्रकेतु याला नमस्कार केले ॥ ४६ ॥ पण आपणास अपराध केला नसतांही याराजा- नें अविचारानें इतके दिवस बंदिशाळेंत घातलें, हें आठवून ते भयभीत झाल्यामुळें कांहींच बोलले

नाहींत. तेव्हां चंद्रकेतुराजा त्यांच्याकडे पाहून ह्मणाला ॥ ४७ ॥ सावकारहो, तुह्मांला इतके दिवस जें दुःख भोगावें लागलें हें केवळ तुमच्या प्रतिकूळ दैवानेंच होय. याचा दोष कोणाकडेसच नाहीं. आतां तुह्मांला कांहीं भय नाहीं, असें सांगून राजानें त्यांचें समाधान केलें. त्यांच्या पायांतल्या बेड्या काढल्या होत्या तरी प्रतिबंध होताच. तो दूर करून राजानें त्यांचें श्मश्रुकर्मादि करविलें. नंतर त्यांना मंगलस्ना-

देवात्प्राप्तंमहद्दुःखमिदानींनास्तिवैभयं ॥ तदानिगडसंत्यागंक्षौरकर्माद्यकारयत् ॥
॥ ४८ ॥ वस्त्रालंकारकंदत्वापरितोष्यनृपश्चतौ ॥ पुरस्कृत्यवणिकपुत्रौवचसातोषय
द्भृशं ॥ ४९ ॥ पुरानीतंतुयद्द्रव्यंद्विगुणीकृत्यदत्तवान् ॥ प्रोवाचतौततोराजागच्छ
साधोनिजाश्रमं ॥ ५० ॥

न घालून व उत्तम वस्त्रें अलंकार देऊन राजानें त्यांना फार संतुष्ट केले व त्यांस बहुमानपूर्वक आपल्या-जवळ बसवून गोडभाषणानें झालेल्या सर्व दुःखांचा विसर पाडला ॥ ४९ ॥ आणि त्यांचें जें द्रव्य पूर्वीं घेतलें होतें त्याच्या दुप्पट द्रव्य त्यांना दिलें. नंतर तो राजा साधूला ह्मणाला, साधो, आतां तुझी इच्छा असेल तसें कर. येथें व्यापार करीत रहा, अथवा आपल्या घरीं जा. आमच्याकडून कांहीं प्रतिबंध नाहीं ॥५०॥

हें ऐकून जांवयासहवर्तमान साधु राजाला नमस्कार करून ह्मणाला, आह्माला आपल्या घरींच जावयाचें आहे. आणि आपल्या प्रसादानें आह्माला पुनः घराचें दर्शन होणार आहे ॥ ५१ ॥ इति श्रीरेवाखंडे सत्यनारायणव्रतकथायां महाराष्ट्रविवृतौ तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥ छ ॥ सूत ह्मणाला, याप्रमाणें तो जांवयासहित साधुवाणी दुःखांतून मुक्त झाल्यानंतर राजाची आज्ञा घेऊन वाटेंत कांहीं विघ्नें न व्हा-

राजानंप्रणिपत्याहगंतव्यंत्वत्प्रसादतः॥५१ ॥ ॥ इतिश्रीसत्यनारायणव्रतकथायांतृ तीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥ सूतउवाच ॥ यात्रांतुकृतवान्साधुर्मंगलायनपूर्विकां ॥ ब्राह्मणेभ्योधनंदत्वातदातुनगरंययौ ॥ १ ॥ कियद्दूरेगतेसाधौसत्यनारायणःप्रभुः ॥ जिज्ञासांकृतवान्साधोकिमस्तितवनौस्थितं ॥ २ ॥

वीं, ह्मणून पुण्याहवाचन करून व ब्राह्मणांला दक्षिणा वगैरे देऊन शुभमुहूर्तावर सर्व द्रव्यासहित नावेंत बसून तो आपल्या गांवाला चालला ॥१॥ त्याची ती नांव बरीच दूर गेली असतां दोनप्रहरीं भोजनाकरितां नौका नांगरून तो साधुवाणी जांवयासहित तीरीं उतरला. इतक्यांत तेथें सत्यनारायणप्रभु ह्या वाण्यानें आपल्या शठपणामुळें पुष्कळ दुःख भोगिलें; आतां तरी याणें शठत्व सोडिलें कीं नाहीं याची परीक्षा पहावी

ह्मणून संन्याशाचें रूप घेऊन आला आणि साधूला ह्मणाला, शेटजी, तुमच्या नावेंत काय भरलें आहे ? ॥ २ ॥ तें ऐकून, संन्याशास आमच्या मालाची चौकशी कशाला पाहिजे ? असें समजून द्रव्यमदानें उन्मत्त झालेले ते दोघे वाणी हंसून ह्मणाले, अहो संन्यासीबोवा, तुह्मी कां विचारितां ? द्रव्य असलें तर तुमच्या मनांत उपटून न्यावयाचें आहे वाटतें ? ॥३॥पण आमच्या ह्या नावेंत कांहीं द्रव्य नाहीं, केवळ वे-

ततोमहाजनौमत्तौहेलयाचप्रहस्यवै ॥ कथंपृच्छसिभोदंडिन्मुद्रांनेतुंकिमिच्छसि ॥ ३ ॥ लतापत्रादिकंचैववर्ततेतरणौमम ॥ निष्ठुरंचवचःश्रुत्वासत्यंभवतुतेवचः ॥४॥ एवमुक्त्वागतःशीघ्रंदंडीतस्यसमीपतः॥कियद्दूरेततोगत्वास्थितःसिंधुसमीपतः ॥५॥ गतेदंडिनिसाधुश्चकृतनित्यक्रियस्तदा ॥ उत्थितांतरणींदृष्ट्वाविस्मयंपरमंययौ ॥ ६ ॥

ली, पानें वगैरे भरलीं आहेत, दुसरें कांहीं नाहीं. हें त्यांचें कपटाचें व उद्दामपणाचें भाषण ऐकून भगवान् सत्यनारायण रागावून ह्मणाला, शेटजी, तथास्तु ! तुह्मीं सांगितलें तेंच असो ॥ ४ ॥ असें बोलून यतिरूपी सत्यनारायण तेथून कांहीं दूर जाऊन सिंधुतीरीं एका झाडाखालीं बसला ॥ ५ ॥ इकडे संन्यासी गेल्यानंतर साधु काय करावयाचें होतें तें आटपून परत नावेंत बसण्याकरितां निघाला. तों

स.ना.

॥२६॥

द्रव्याच्या भारानें जी नाव पाण्यांत दबून गेली होती, ती आंतलें द्रव्य लतापत्रादिक झाल्यामुळें तत्काल वर तरंगूं लागली. तें पाहून साधु विस्मित होऊन पाहूं लागला ॥ ६ ॥ तों नावेंत कांहींच द्रव्य नसून सारें लतापत्रादिक भरलें आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तें पाहतांच तो घाबरून मूर्च्छा येऊन भूमीवर पडला. नंतर त्यास जांवयानें कांहीं उपचार करून सावध केल्यावर, हें काय झालें याविषयीं चिंता

दृष्ट्वालतादिकंचैवमूर्च्छितोन्यपतद्भुवि ॥ लब्धसंज्ञोवणिक्पुत्रस्ततश्चिंतान्वितोऽभवत् ॥ ७ ॥ तदातुदुहितुःकांतोवचनंचेदमब्रवीत् ॥ किमर्थंक्रियतेशोकःशापोदत्तश्चदंडिना ॥ ८ ॥ शक्यतेनेनसर्वंहिकर्तुंचात्रनसंशयः ॥ अतस्तच्छरणंयामोवांछितार्थोभविष्यति ॥ ९ ॥

करीत बसला ॥ ७ ॥ तेव्हां जांवई ह्मणाला, मामा, आतां कां शोक करितां ? त्या संन्याशानें शाप दिल्यामुळें असें झालें, यांत कांहीं संशय नाहीं ॥ ८ ॥ त्याच्या तेजावरून असें वाटतें कीं, तो पाहिजे तें करण्याला समर्थ आहे, यांत कांहीं संशय नाहीं. याकरितां त्यालाच आपण शरण जाऊंया ह्मणजे आपला इच्छित अर्थ सिद्ध होईल. ॥ ९ ॥



॥२६॥

याप्रमाणें जांवयाचें भाषण ऐकून साधूलाही तें खरें वाटलें. तेव्हां संन्यासिरूपी सत्यनारायण झाडाखालीं यांची मजा पहात बसला होता, त्याच्या जवळ तो साधु गेला. आणि त्यास पाहून भक्तिपूर्वक नमस्कार करून मोठ्या आदरानें ह्मणाला ॥ १० ॥ महाराज, आपल्या जवळ मीं जें कांहीं असत्य बोललों, तो मज

जामातुर्वचनंश्रुत्वातत्सकाशंगतस्तदा ॥ दृष्ट्वाचदंडिनंभक्त्यानत्वाप्रोवाचसादरं ॥
॥ १० ॥ क्षमस्वचापराधंमेयदुक्तंतवसन्निधौ ॥ एवंपुनःपुनर्नत्वामहाशोकाकुलोऽ
भवत् ॥ ११ ॥ प्रोवाचवचनंदंडीविलपंतंविलोक्यच ॥ मारोदीःशृणुमद्वाक्यंम
मपूजाबहिर्मुखः ॥ १२ ॥ ममाज्ञयाचदुर्बुद्धेलब्धंदुःखंमुहुर्मुहुः ॥ तच्छ्रुत्वाभग
वद्वाक्यंस्तुतिंकर्तुंसमुद्यतः ॥ १३ ॥

कडून मोठा अपराध झाला, त्याची आपण क्षमा करा. याप्रमाणें वरचेवर त्याची नमस्कारपूर्वक प्रार्थना करून शोकाकुल झाला ॥ ११ ॥ तेव्हां साधूचा तो विलाप पाहून त्या संन्याशास त्याची मोठी दया आली, आणि तो ह्मणाला, अरे मूर्खा, उगीच कां रडतोस ? तुझ्यावर असे प्रसंग येण्याचें कारण सांगतों ऐक. तूं संकल्प केला असून माझी पूजा केली नाहींस ॥ १२ ॥ ह्मणून मी तुझ्यावर अवकृपा केली. अरे

दुर्बुद्धे, तुला बंदिशाळा इत्यादि वरचेवर दुःखें भोगावीं लागलीं, हीं सर्व माझ्याच आज्ञेनें असें समज. अ-सें त्या संन्याशाचें वाक्य ऐकून साधूला पूर्वीचें स्मरण होऊन तो मोठा पश्चात्तापयुक्त झाला. व हा संन्यासी साक्षात् सत्यनारायणच असें समजून त्याची स्तुति करण्याविषयीं उद्युक्त झाला ॥ १३ ॥ साधु ह्मणाला, हे भगवन्, तुमची माया मोठी प्रबल आहे. तिनें मोहित झालेले ब्रह्मादिक देवही तुमचे गुण व

॥ साधुरुवाच ॥ ॥ त्वन्मायामोहिताःसर्वेब्रह्माद्यास्त्रिदिवौकसः ॥ नजानंतिगुणानूरूपंतवाश्चर्यमिदंप्रभो ॥ १४ ॥ मूढोऽहंत्वांकथंजानेमोहितस्तवमायया ॥ प्रसीदपूजयिष्यामियथाविभवविस्तरैः ॥ १५ ॥ पुरावित्तंचतत्सर्वंत्राहिमांशरणागतं ॥ श्रुत्वाभक्तियुतंवाक्यंपरितुष्टोजनार्दनः ॥ १६ ॥

तुमचीं रूपें यथार्थ रीतीनें जाणत नाहींत, हें मोठेंच आश्चर्य आहे. ॥ १४ ॥ हे प्रभो, अशा दुस्तर मायेनें मोहित झालेला मी मूर्ख तुह्मांला कसा जाणीन ! माझ्या हातून जे अपराध झाले ते केवळ अज्ञानानें घडले आहेत; याकरितां आपण मजवर प्रसन्न व्हा. मला जशी अनुकूळता आहे, तदनुसार मी आपलें पूजन करीन ॥ १५ ॥ माझें जें पूर्वीं द्रव्य होतें, तें सर्व मला आपल्या कृपेनें पुनः प्राप्त व्हावें.

मी शरण आलों आहें, तर प्रभो, माझें रक्षण करावें. याप्रमाणें साधूचें भक्तियुक्त वाक्य ऐकून भगवान् सत्यनारायण संतुष्ट झाला ॥ १६ ॥ आणि त्याला वांछित असलेला वर देऊन संन्यासरूपधारी सत्यनारायण अंतर्धान पावला. नंतर साधु जांवयासह नावेवर चढून पाहतो, तों ती द्रव्यानें भरगच्च भरली आ-

वरंचवांछितंदत्त्वातत्रैवांतर्दधेहरिः ॥ ततोनावंसमारुह्यदृष्ट्वावित्तप्रपूरितां ॥ १७ ॥ कृपयासत्यदेवस्यसफलंवांछितंमम ॥ इत्युक्त्वास्वजनैःसार्द्धंपूजांकृत्वायथाविधि ॥ १८ ॥ हर्षेणचाभवत्पूर्णःसत्यदेवप्रसादतः ॥ नावंसंयोज्ययत्नेनस्वदेशगमनंकृतम् ॥ १९ ॥ साधुर्जामातरंप्राहपश्यरत्नपुरींमम ॥ दूतंचप्रेषयामासनिजवित्तस्यरक्षकं ॥ २० ॥

हे. तें पाहून ॥१७॥ भगवान् सत्यनारायणाच्या कृपेनें माझें सर्व इच्छित सफल झालें. असें बोलून त्यानें त्या दिवशीं तेथेंच मुक्काम करून, आपल्या बरोबरच्या मंडळीसह सत्यनारायणाची यथाविधि पूजा केली. ॥ १८ ॥ नंतर तो साधुवाणी त्या सत्यदेवाच्या प्रसादानें हर्षभरित होऊन स्वदेशीं चालू झाला. ॥ ॥ १९ ॥ जातां जातां नाव त्याच्या गांवा जवळ जवळ आली, तेव्हां साधु आपल्या जांवयाला ह्मणतो,

जांवईबोवा, ही पहा आपली रत्नपुरी दिसूंलागली. आतां आपण त्वकर घरीं पोहोंचूं असें बोलून लागलाच त्याणें आपण आल्याचें वर्तमान कळविण्याकरितां आपल्या द्रव्यरक्षक दूतांपैकीं एकास तेथेंच उतरून घरीं पाठविलें ॥ २० ॥ तो दूत शहरांत साधूच्या घरीं जाऊन लीलावतीस भेटला आणि ज्यांच्या आगमनाविषयीं ती रात्रंदिवस वाट पाहत होती, ते पति आणि जांवई आल्याचें वर्तमान त्या दूतानें

दूतोऽसौनगरंगत्वासाधुभार्यांविलोक्यच ॥ प्रोवाचवांछितंवाक्यंनत्वाबद्धांजलिस्तदा ॥ २१ ॥ निकटेनगरस्यैवजामात्रासहितोवणिक्॥आगतोबंधुवर्गैश्चवित्तैश्चबहुभिर्युतः ॥ २२ ॥ श्रुत्वादूतमुखाद्वाक्यंमहाहर्षवतीसती ॥ सत्यपूजांततःकृत्वा प्रोवाचतनुजांप्रति ॥ २३ ॥

तिला नमस्कार करून हात जोडून सांगितलें ॥ २१॥ दूत ह्मणाला, बाईसाहेब, शहराच्या जवळ जांवईबोवांसहवर्तमान शेटजी आपल्या बरोबरच्या मंडळीला घेऊन येऊन पोंचले आहेत. बरोबर अपरंपार द्रव्यहि आणिलें आहे ॥२२॥असें दूताच्या मुखांतून वाक्य ऐकून त्या साध्वी लीलावतीला मोठा हर्ष झाला. तिनें पूर्वीं नवसलेली सत्यनारायणाची पूजा तत्काल केली आणि कन्येस ह्मणाली. ॥ २३ ॥

मुली कलावति, माझी पूजा आटपली. तर मी आतां पुढें जातें, तूं पूजा आटपून आपल्या पित्याच्या द-र्शनाला मागाहून लवकर ये. असें सांगून लीलावती पुढें गेली. इकडे आईचें भाषण श्रवण करून कलावतीनें सत्यनारायणाची पूजा यथासांग पूर्ण केली ॥ २४ ॥ परंतु नवऱ्याच्या भेटीला जाण्याची फार उत्कंठा लागली होती, त्या गडबडींत प्रसाद भक्षण करण्याचें विसरून ती घाईघाईनें नवऱ्याकडे गेली;

व्रजामिशीघ्रमागच्छसाधुसंदर्शनायच ॥ इतिमातृवचःश्रुत्वाव्रतंकृत्वासमाप्यच ॥ ॥ २४ ॥ प्रसादंचपरित्यज्यगतासापिपातिंप्रति ॥ तेनरुष्टःसत्यदेवोभर्तारंतरणिं तथा ॥ २५ ॥ संहृत्यचधनैःसार्द्धंजलेतस्याऽवमज्जयन् ॥ ततःकलावतीकन्यान विलोक्यनिजंपतिं ॥ २६ ॥

त्यायोगानें सत्यनारायणदेव रुष्ट होऊन त्यानें कलावतीला शिक्षा केली. ती अशी कीं, कांहीं सामान व साधु नावेंतून प्रथम खालीं उतरला आणि त्याचा जांवई व द्रव्य मागाहून उतरावयाचीं होतीं. इतक्यांत नांव आणि जांवई एकाएकीं अदृश्य झालीं ॥ २५ ॥ सर्व द्रव्य व जांवयासहित साधूची नाव नदींत कोठें दिसेनाशी झाली, इतक्यांत कलावती तेथें येऊन पोंचली. ती आपला पति कोठें दिसत नाहीं असें पाहून॥२६॥

त्याच्या करितां शोक करीत होत्साती व्याकुळ होऊन रडत रडत भूमीवर पडली. तेव्हां इतकी मेहनत करून आणलेलें द्रव्य आणि जांवई यांसहित नाव कोठें दिसत नाहीं व इकडे मुलगी फार दुःखित झाली हें पाहून ॥ २७ ॥ भयभीत झालेला साधु हें काय आश्चर्य असावें, ह्मणून मनांत विचार करूं लागला.

शोकेनमहतातत्ररुदतीचापतद्भुवि ॥ दृष्ट्वातथाविधांनावंकन्यांचबहुदुःखितां ॥ ॥ २७ ॥ भीतेनमनसासाधुःकिमाश्चर्यमिदंभवेत् ॥ चिंत्यमानाश्चतेसर्वेबभूवुस्त रिवाहकाः ॥ २८ ॥ ततोलीलावतीकन्यांदृष्ट्वासाविह्वलाभवत् ॥ विललापातिदुः खेनभर्तारंचेदमब्रवीत् ॥ २९ ॥ इदानींनौकयासार्द्धंकथंसोऽभूदलक्षितः ॥ नजा नेकस्यदेवस्यहेलयाचैवसाहृता ॥ ३० ॥

सर्व नावाडीलोक विलक्षण चिंताक्रांत झाले. ॥ २८ ॥ नंतर लीलावती आपल्या मुलीची ती अवस्था पाहून फार विह्वळ झाली आणि मोठ्यानें विलाप करीत होत्साती साधूला ह्मणाली ॥ २९ ॥ जांवईबोवा आतांच नावेवर असलेले आमच्या दृष्टीस पडले आणि इतक्यांत ते कसे अदृश्य झाले! कोणत्या देवाची अवज्ञा केल्यामुळें नाव नाहींशी झाली हें कांहीं कळत नाहीं ॥ ३० ॥

त्या भगवान् सत्यनारायणाचें माहात्म्य जाणण्याला कोण समर्थ आहे! असें बोलून ती अतिशय विलाप करूं लागली. तिच्या बरोबर सर्व मंडळी शोकाकुल झाली ॥ ३१ ॥ नंतर लीलावती आपल्या मुलीला मांडीवर घेऊन रुदन करीत होत्साती विलाप करूं लागली. पुष्कळ वेळ गेला तरी पतीचा कांहीं ठिकाण

सत्यदेवस्यमाहात्म्यंज्ञातुंवाकेनशक्यते ॥ इत्युक्त्वाविललापैवततश्वस्वजनैःसह ॥ ३१ ॥ ततोलीलावतीकन्यांक्रोडेकृत्वारुरोदह ॥ ततःकलावतीकन्यानष्टेस्वामिनिदुःखिता ॥ ३२ ॥ गृहीत्वापादुकेतस्यानुगंतुंचमनोदधे ॥ कन्यायाश्वरितंदृष्ट्वासभार्यःसज्जनोवणिक् ॥ ३३ ॥ अतिशोकेनसंतप्तश्चिंतयामासधर्मवित् ॥ हृतोवासत्यदेवेनभ्रांतोऽहंसत्यमायया ॥ ३४ ॥

नाहीं, असें पाहून साधूची कन्या कलावती, आपला पति खरोखरच नष्ट झाला असें समजून दुःखित होत्साती ॥ ३२ ॥ नावेंतून उतरलेल्या सामानांतील भर्त्याच्या पादुका घेऊन त्यांसह सती जाण्याला तयार झाली. तेव्हां साधु मुलीचें तें वर्तन पाहून सर्वांसहित ॥ ३३ ॥ अत्यंत शोकानें संतप्त होत्साता विचार करूं लागला. साधु पूर्वीं शठ होता, तरी सत्यनारायणानें चांगली शिक्षा केल्यावरून सांप्रत धर्माकडे त्याचें

स.ना.

॥३०॥

चित्त लागलें होतें. तो ह्मणाला, माझ्या जांवयाला सत्यनारायणानेंच अदृश्य केलें आहे. किंवा मीच त्याच्या मायेनें भ्रांत झालों आहें हें कोण जाणे. कांहीं असो. ॥ ३४ ॥ पण आतां सत्यनारायणाच्या कृपेनें माझा जांवई दृष्टीस पडेल, तर मी लागलीच येथें यथानुकूल सत्यनारायणाची पूजा करीन. असा विचार करून, त्यानें आपलया सर्व मंडळीला बोलावून त्यांजकडून सत्यनारायणपूजेचा नवस केला. ॥ ३५ ॥

सत्यपूजांकरिष्यामियथाविभवविस्तरैः ॥ इतिसर्वान्समाहूयकथयित्वामनोरथं ॥ ३५ ॥ नत्वाचदंडवद्भूमौसत्यदेवंपुनःपुनः ॥ततस्तुष्टःसत्यदेवोदीनानांपरिपालकः ॥ ३६ ॥ जगादवचनंचैनंकृपयाभक्तवत्सलः ॥ त्यक्त्वाप्रसादंतेकन्यापतिंद्रष्टुंसमागता ॥ ३७ ॥

सत्यनारायणाला वरचेवर भूमीवर दंडवत नमस्कार घातले. तेव्हां दीनदुबळ्यांचें रक्षण करणारा व भक्तवत्सल जो भगवान् तो संतुष्ट होऊन ॥ ३६ ॥ आकाशवाणीनें असें ह्मणाला कीं, अरे साधो, तुझ्या मुलीनें माझी पूजा केली; परंतु शेवटीं माझा प्रसाद घेतल्यावांचूनच ही लवकर आपल्या नवऱ्याच्या भेटीला धांवली. याचा राग मला आला ॥ ३७ ॥

क.

॥३०॥

म्हणूनच हिचा नवरा येथल्यायेथें अदृश्य झाला आहे. जर आतां ही तुझी मुलगी घरीं जाऊन माझा प्रसाद भक्षण करून येईल तर ॥ ३८ ॥ हे साधो, तुझ्या मुलीचा पति तिला पुनः प्राप्त होईल, यांत कांहीं संशय नाहीं. असें एकाएकीं आकाशांतून वाक्य कानीं पडतांच ॥ ३९ ॥ कलावती घाबऱ्या घाबऱ्यां

अतोऽदृष्टोऽभवत्तस्याःकन्यकायाःपतिर्ध्रुवम् ॥ गृहंगत्वाप्रसादंचभुक्त्वासायातिचेत्पुनः ॥ ३८ ॥ लब्धभर्त्रीसुतासाधोभविष्यतिनसंशयः ॥ कन्यकातादृशंवाक्यं श्रुत्वागगनमंडलात् ॥ ३९ ॥ क्षिप्रंतदागृहंगत्वाप्रसादंचबुभोजसा ॥ सापश्चात्पुनरागत्यददर्शसजनंपतिं ॥ ४० ॥ ततःकलावतीकन्याजगादपितरंप्रति ॥ इदानींचगृहंयाहिविलंबंकुरुषेकथं ॥ ४१ ॥ तच्छ्रुत्वाकन्यकावाक्यंसंतुष्टोऽभूद्वणिक्सुतः ॥ पूजनंसत्यदेवस्यकृत्वाविधिविधानतः ॥ ४२ ॥

घरीं गेली आणि प्रसाद भक्षण करून ती पुनः नदीतीरीं येऊन पाहत्ये तों तिचा पति तिच्या दृष्टीस पडला. ॥ ४० ॥ नंतर ती कलावती पित्याला ह्मणाली, बाबा, आतां घरीं चला. विलंब कां करतां ? ॥४१॥ याप्रमाणें मुलीचें वाक्य ऐकून साधूला परम संतोष झाला. आणि त्याणें तेथल्या तेथें यथाविधि सत्यना-

रायणाची पूजा केली ॥ ४२ ॥ नंतर पूजा समाप्त करून बरोबर आणलेलें द्रव्य व आपले आप्त, इष्टमित्र यांसहवर्तमान तो घरीं जाता झाला. तेव्हांपासून पौर्णिमा आणि संक्रांती या पर्वकाळीं सत्यनारायणाची पूजा करण्याचा त्यानें नियम चालविला ॥ ४३ ॥ त्यायोगानें तो साधुवाणी सत्यनारायणाच्या प्रसादानें इहलोकीं उत्तम सुखाचा अनुभव घेऊन अंतीं सत्यनारायणाच्या लोकाला अर्थात् वैकुंठास जाता

धनैर्बंधुगणैःसार्द्धंजगामनिजमंदिरं ॥ पौर्णमास्यांचसंक्रांतौकृतवान्सत्यपूजनं ॥ ॥ ४३ ॥ इहलोकेसुखंभुक्त्वाचांतेसत्यपुरंययौ ॥ ४४ ॥ ॥ इतिसत्यनारायणकथायांचतुर्थोऽध्यायः ॥४ ॥ ॥ सूतउवाच ॥ ॥ अथान्यच्चप्रवक्ष्यामिश्रृणुध्वंमुनिसत्तमाः ॥ आसीत्तुंगध्वजोराजाप्रजापालनतत्परः ॥ १ ॥

झाला. ॥४४॥ इति श्रीसत्यनारायणकथायां महाराष्ट्रविवृतौचतुर्थोऽध्यायः॥४ ॥ ॥ सूत ह्मणतात, ऋषीहो, व्रताचा संकल्प केला असून त्याप्रमाणें न करणारा व सत्यनारायणाची अवज्ञा करणारा व त्याच्या प्रसादाचा अव्हेर करणारा यांला कशीं दुःखें प्राप्त होतात, हें समजण्याकरितां मीं तुह्माला साधुवैश्याचा इतिहास सांगितला. आतां हे ऋषिश्रेष्ठहो, सत्यनारायणाचा प्रसाद कोणी देत असतां अनादर करणाऱ्या-

ला कसें दुःख प्राप्त होतें, याविषयीं तुह्माला इतिहास सांगतों. प्रजेचें पालन करण्याविषयीं तत्पर असा तुंगध्वजनामक एक राजा होता ॥ १ ॥ त्याला सत्यदेवाच्या प्रसादाचा त्याग केल्यामुळें मोठें दुःख प्राप्त झालें तें असें कीं, कोणेएकेकाळीं त्या तुंगध्वजराजानें मृगया करण्याकरितां अरण्यांत जाऊन अनेक प्रकारचे पशु मारिले. ॥ २ ॥ आणि तो श्रांत होऊन एका मोठ्या वडाच्या झाडाखालीं सावलीला येऊ-

प्रसादंसत्यदेवस्यत्यक्त्वादुःखमवापसः॥एकदासवनंगत्वाहत्वाबहु
विधान्पशून् ॥ २ ॥ आगत्यवटमूलंचदृष्ट्वासत्यस्यपूजनं ॥ गोपाः
कुर्वंतिसंतुष्टाभक्तियुक्ताःसबांधवाः ॥ ३ ॥ राजादृष्ट्वातुदर्पेणनग
त्वातंननामसः ॥ ततोगोपगणाःसर्वेप्रसादंनृपसन्निधौ ॥ ४ ॥

न बसला. तों तेथें धनगरलोक आप्तमित्रांसह जमून भक्तियुक्त होत्साते मोठ्या आनंदानें सत्यनारायणाची पूजा करीत होते. ॥ ३ ॥ राजा तुंगध्वज तेथें जवळच बसला होता, तरी आपण राजा आणि हे धनगर अशा गर्वानें तो पुढें गेला नाहीं. त्यानें सत्यनारायणाला नमस्कार देखील केला नाहीं. पण त्या बिचाऱ्या गरीब गुराख्यांनीं प्रसाद वांटावयाच्या वेळीं प्रथम मोठ्या नम्रतेनें राजाजवळ ॥ ४ ॥

एका पानावर प्रसाद ठेवून पुनः परत आपल्या ठिकाणीं येऊन सर्वांनीं हंसत खेळत आनंदानें प्रसाद भक्षण केला. इकडे राजा त्या प्रसादाचा त्याग करून घरीं निघून गेला, व त्यामुळें त्याला मोठें दुःख प्राप्त झालें॥५॥तें असें कीं, त्याचे शंभरही पुत्र सहज एकाएकीं मरण पावले. शहरांत बंड होऊन राजवाड्यांत लुटालूट झाली. जो तो राजावर प्रतिकूळ झाला; हें पाहून त्या राजास मोठी चिंता लागून अकस्मात असें

संस्थाप्यपुनरागत्यभुक्त्वासर्वैर्यथेप्सितं॥ततःप्रसादंसंत्यज्यराजादुःखमवापसः ॥५
तस्यपुत्रशतंनष्टंधनधान्यादिकंचयत्॥सत्यदेवेनतत्सर्वंनाशितंममनिश्चितं ॥६॥अत
स्तत्रैवगच्छामियत्रदेवस्यपूजनं ॥ मनसातुविनिश्चित्यययौगोपालसन्निधौ॥७॥ततो
सौसत्यदेवस्यपूजांगोपगणैःसह ॥ भक्तिश्रद्धान्वितोभूत्वाचकारविधिनान्नृपः ॥८॥

होण्याचें कारण काय याचा विचार करतां करतां, सत्यनारायणाचा मी अपमान केला यामुळें तो रुष्ट होऊन त्यानेंच हा माझा सर्वस्वी नाश केला, यांत कांहीं संशय नाहीं॥६॥तस्मात् जेथें गुराखी पूजा करीत होते, तेथेंच पुनः आपण जावें; असा मनांत संकल्प धरून तो पुनः त्या वडाच्या झाडाखालीं प्राप्त झाला ॥ ॥ ७ ॥ नंतर तेथें सर्व गवळ्यांस आग्रहपूर्वक गोळा करून राजा आपण त्यांत सामील होऊन श्रद्धा भ-

क्तियुक्त होत्साता यथाविधि सत्यनारायणाची पूजा करिताझाला. ॥ ८ ॥ याप्रमाणें अभिमान सोडून त्यानें सत्यनारायणाची पूजा करितांच त्याचे नष्ट झालेले पुत्र पुनः प्राप्त झाले, व नष्ट झालेलें द्रव्य पुनः मिळालें. राज्यांत जिकडे तिकडे शांतता झाली. नंतर तो तुंगध्वजराजा नेहमी सत्यनारायणाची भक्तिपूर्वक प्रतिमासीं पूजा करूं लागला. त्या योगानें इहलोकांत सर्व सुखाचा उपभोग करून शेवटीं सत्यना-

सत्यदेवप्रसादेनधनपुत्रान्वितोऽभवत् ॥ इहलोकेसुखंभुक्त्वा
चांतेसत्यपुरंययौ ॥९॥ यइदंकुरुतेसत्यव्रतंपरमदुर्लभं ॥ शृणो
तिचकथांपुण्यांभक्तियुक्तःफलप्रदां ॥१०॥ धनधान्यादिकंतस्य
भवेत्सत्यप्रसादतः॥दरिद्रोलभतेवित्तंबद्धोमुच्येतबंधनात्॥११॥

रायणाच्या नगरीला गेला. ॥ ९ ॥ सूत ह्मणतात, ऋषीहो, याप्रमाणें मी तुह्माला हें व्रत सांगितलें. अल्प उपायानें मनुष्यमात्रांचें इच्छित पूर्ण होण्याला हेंच उत्तम साधन आहे. हें परम दुर्लभ सत्यनारायणाचें व्रत जो करील व याची उत्तम फल देणारी पुण्यकारक अशी ही कथा भक्तियुक्त होत्साता श्रवण करील ॥ १० ॥ त्याला सत्यनारायणाच्या प्रसादानें धनधान्यादिक सर्व प्राप्त होईल. दरिद्री असेल

त्याला नारायणाच्या कृपेनें पुष्कळ द्रव्य प्राप्त होईल. प्रतिबंधांत असलेला, तो प्रतिबंधापासून मुक्त होईल. ॥ ११ ॥ व भ्याला असेल तो भयापासून खचित मुक्त होईल, यांत संशय नाहीं. आणि तो येथें ईप्सित फलांचा उपभोग घेऊन देहांतीं वैकुंठाला जाईल ॥ १२ ॥ ऋषींहो, याप्रमाणें मी तुह्माला हें सत्यनारायणाचें व्रत सांगितलें. हें केलें असतां मनुष्यमात्र सर्व दुःखापासून मुक्त होतो ॥ १३ ॥ कृत,

भीतोभयात्प्रमुच्येतसत्यमेवनसंशयः ॥ ईप्सितंचफलंभुक्त्वाचांतेसत्यपुरंव्रजेत् ॥ १२ ॥ इतिवःकथितंविप्राःसत्यनारायणव्रतं ॥ यत्कृत्वासर्वदुःखेभ्योमुक्तोभवतिमानवः॥ १३ ॥ विशेषतःकलियुगे सत्यपूजाफलप्रदा ॥ केचित्कालंवदिष्यंतिसत्यमीशंतमेवच ॥१४॥

त्रेता, द्वापार आणि कलि या चारही युगांत सत्यनारायणाची पूजा मनोरथ पूर्ण करणारी आहे, तथापि या कलियुगांत ही सत्यनारायणाची पूजा विशेष फलदायक आहे. तो भगवान् सत्यनारायण अनेक रूपें धारण करतो. जेव्हां तो उग्र होतो तेव्हां त्याला काल ह्मणतात. शांत असतो त्यावेळीं सत्य ह्मणतात, त्यालाच कोणि ईश ह्मणतात. ॥ १४ ॥

कित्येक सत्यनारायण ह्मणतात, आणि दुसरे कोणी सत्यदेव ह्मणतात. याप्रमाणें अनेकप्रकारचीं रूपें धारण करून तो भगवान् सर्वांची इच्छित कामना पूर्ण करितो. ॥ १५ ॥ तो या कलियुगांत सत्यनारायणस्वरूपानें नेहमी भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा होईल. याप्रमाणें फलश्रुति सांगून सूत ह्मणतात,

सत्यनारायणंकेचित्सत्यदेवंतथापरे ॥ नानारूपधरोभूत्वासर्वेषामीप्सितप्रदः ॥ ॥ १५ ॥ भविष्यतिकलौसत्यव्रतरूपीसनातनः ॥ यइदंपठतेनित्यंश्रृणोतिमुनिसत्तमाः ॥ १६ ॥ सत्यंनश्यंतिपापानिसत्यदेवप्रसादतः ॥ १७ ॥ इतिश्रीस्कंदपुराणेरेवाखंडेश्रीसत्यनारायणव्रतकथायांपंचमोऽध्यायः ॥५॥ श्रीसत्यनारायणार्प०॥

ऋषीहो, व्रताचें तर महात्म्य आहेच; पण जो ही कथा नित्य पठण करील अथवा भक्तिपूर्वक श्रवण करील. ॥ १६ ॥ त्याचीं सत्यनारायणाच्या कृपेनें सर्व पापें नष्ट होतील, हें अगदीं सत्य आहे, यांत कांहीं संशय नाहीं ॥ १७ ॥ ॥ इति श्री स्कंदपुराणे रेवाखंडे सत्यनारायणव्रतकथायां महाराष्ट्रविवृत्तौ पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ ॥ श्रीसत्यनारायणार्पणमस्तु ॥

श्रीः ॥ कथाश्रवणोत्तरम् ॥ आचम्यप्राणानायम्य ॥ अद्यपूर्वोच्चरि० श्रीसत्यनाराय णकथाश्रवणसांगतासिद्ध्यर्थंपुस्तकपूजनपूर्वकंवाचकपूजनमहंकरिष्ये ॥ इतिसंकल्प्य॥ श्रीसरस्वत्यैनमइतिनाममंत्रेणगंधाद्युपचारैःपुस्तकपूजांकृत्वा ॥ श्रीव्यासस्वरूपिणेब्रा ह्मणायेदमासनमित्यादि पाद्यार्घ्याचमनीयगंधपुष्पाक्षतवस्त्रालंकारतांबूलफलदक्षिणा भिर्यथाविभवंपौराणिकपूजांकुर्यात्॥ ॥ततोभगवतेमहानैवेद्यार्पणं॥आचम्य॥ अद्यपू० प्रीत्यर्थं गंधादिभिःपूजयिष्ये ॥ॐतस्माद्यज्ञात्सर्वहुतऋचः०॥श्रीखंडंचं०॥श्रीसत्य०॥ चंदनंस० ॥ अक्षतान्सम०॥ॐतस्मादश्वा०॥माल्यादीनि०॥सत्यना०॥पुष्पाणिस० ॥ ॐयत्पुरुषं० ॥ वनस्पतिरसो० ॥ श्रीसत्यना०॥ धूपंस० ॥ ॐब्राह्मणोस्य०॥साज्यंच० श्रीसत्यना० ॥ दीपंस० ॥ ॐचंद्रमा० ॥ नैवेद्यंगृह्यतांदेव० ॥ श्रीसत्यना०॥महानैवेद्यं सम०॥अमृतो० ॥ प्राणाय० ६॥नैवेद्यमध्येप्राशनार्थेपानीयंस० ॥ पुनःप्राणाय० ६ ॥ उत्तरापोशनंस० ॥ हस्तप्रक्षा० ॥ मुखप्रक्षा० ॥ आचमनीयं० करोद्वर्तं० ॥पूगीफल

मितितांबूलं ॥ हिरण्यगर्भेतिदक्षिणां ॥ इदंफलमितिफलम् ॥ ततःआर्तिक्यम् ॥ (आ
र्ती) नमोस्त्वनं०नमस्कारं ॥ यानिकानिचेतिप्रदक्षिणां ॥ मंत्रपुष्पांजलिंसमर्प्य ॥ अ
नेनपंचोपचारपूजनेनश्रीसत्यनारायणःप्रीयतांनमम ॥ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ ॥
अद्यपूर्वोच्च०श्रीसत्यनारायणव्रतसांगतासिद्ध्यर्थंयथाशक्ति (यथावकाशेन) ब्राह्मणसुवा
सिनीसमाराधनमहंकरिष्ये ॥ तथाचभूयसींदक्षिणांदातुमहमुत्सृजे ॥ इतिसंकल्प्यभू
यसींदद्यात् ॥ ॥ ततःसर्वेभ्यस्तीर्थंप्रसादंदत्वास्वयंगृह्णीयात् ॥ तत्रतीर्थग्रहणमंत्रः॥
अकालमृत्युहरणंसर्वपापविनाशनम् ॥ देवपादोदकंतीर्थंजठरेधारयाम्यहम् ॥ इतिती
र्थमंत्रः॥ प्रसादंहस्तेगृहीत्वा ॥ बहुजन्मार्जितंयन्मेदेहेस्तिदुरितंहितत् ॥ प्रसादभक्षणा
द्यातुलयंसत्यजगत्पते ॥ इतिप्रसादंभुक्त्वा ॥ ब्राह्मणान्सुवासिनीश्चभोजयित्वा बंधु
सुहृन्मित्रादिभिःसहस्वयंभुंजीत ॥ ततोरात्रौश्रीसत्यनारायणसन्निधौवेदपठणभजननृ
त्यगायननानावाद्यवादनादिभिर्जागरणंकृत्वा प्रातर्नित्यकर्मसाधनोत्तरमुत्तरपूजांकुर्या

त् ॥ ॥ आचम्य०प्रीत्यर्थं आवाहितदेवतानामुत्तरपूजनमहंकरिष्ये ॥ आवाहिताखिलदेवताभ्योनमः इतिनाममंत्रेणगंधाद्युपचारैःप्रार्थनांतंसंपूजयेत् ॥ ततोहस्तेअक्षतान्गृहीत्वा ॥ ॐउत्तिष्ठब्रह्मणस्पते० ॥ यांतुदेवगणाःसर्वेपूजामादायपार्थिवात् ॥ इष्टकामप्रसिद्ध्यर्थंपुनरागमनायच ॥ इतिदेवतोपरिअक्षतान्निक्षिपेत् ॥ ॥ अथपीठदानम् ॥ आचम्य ॥ अद्यपूर्वो०श्रीसत्यनारायणव्रतसांगतासिद्ध्यर्थंआचार्यायपीठदानंकरिष्ये ॥ तथाचआचार्यपूजनमहंकरिष्ये ॥ इतिसंकल्प्यआचार्यमासनपाद्यादिभिःसंपूज्य ॥ विप्रायवेदविदुषेश्रोत्रियायकुटुंबिने ॥ नरकोत्तारणार्थायअच्युतःप्रीयतामिति ॥ इदंश्रीसत्यनारायणपीठदानं दक्षिणाकंसतांबूलं—शर्मणेब्राह्मणायतुभ्यमहंसंप्रददे प्रतिगृह्यताम् ॥ आचार्यः प्रतिगृह्णामीतिवदेत् ॥ अनेनपीठदानेनश्रीसत्यनारायणःप्रीयतांनममतत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ कर्मांतेद्विराचामेत् ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

# सत्यनारायणपूजाव्रताची सामग्री.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कदलीस्तंभ | प्रतिमा | पानें विड्याचीं | पंचामृतें | रवा |
| नारळ | हळद कुंकूं | दूर्वा | द्रोण | तूप |
| वस्त्रें | गुलाल | फुलें तुळशी | पत्रावळी | दूध |
| सुपाऱ्या | अबीर | सहस्रनामास तुळशी | पुण्याहवाचन करा- | साकर |
| तांदूळ | रांगोळी | पुराणिकास माळ | वयाचें असल्यास | केळीं |
| आम्रपल्लव | फळें | कापूर | पंचपात्र्या तां- | इलाची |
| कलश | यज्ञोपवीत | दीप | ब्याच्या दोन | बदाम |
| तामन ( पूर्णपात्र ) | पंचखाद्यें | उदकाड्या | प्रसादाचें सामान | खिसमिस . |

हें पुस्तक वासुदेव मोरेश्वर पोतदार यांणीं शास्त्री यांजकडून बहुत ग्रंथांच्या आधारें सुधारून अर्थसंबंधानें भरपूर टीपा देऊन मुंबईंत जगदीश्वर छापखान्यांत छापिलें. शके १८११.

इति श्रीसत्यनारायणपूजा सार्थकथा च समाप्ता.